## महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी.-१६२४/प्र.क्र.९१/विमान-१
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२५

**विषय :- मिहान प्रकल्पाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत.**

**वाचा**:-१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.१.०४.२०२४
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२४/वित्त व लेखा/२९६, दि.०७.०६.२०२४ व क्र.मविविकं/ २०१५/प्र.क्र.१९९/भूस/पुर्न, दिनांक २०/६/२०२४
३.सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र बीयुडी-१६२४/प्र.क्र.९१/विमान-१ , दिनांक २३/७/२०२४
४. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२४/वित्त व लेखा/१४११,दि.२४.१२.२०२४
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.१२.०२.२०२५
६. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र बीयुडी-१६२४/प्र.क्र.९१/विमान-१ , दिनांक ७/३/२०२४
७. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर यांचे पत्र क्र.११७/ मिहान/२०२५, दिनांक २५/२/२०२५

**शासन ज्ञापन :-.**

मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२.५% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी "मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उक्त लेखाशीर्षाखाली रु. ४२५.०० कोटी (रु.चारशे पंचवीस कोटी फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.३ व ६ च्या शासन निर्णयान्वये सदर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.२५५.०० कोटी (रु.दोनशे पंचावन्न कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बिम्स प्रणाली) वितरीत करण्यात आला आहे.

२.	उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत नियोजन व वित्त विभागाने रु.४२.५० कोटी (रुपये बेचाळीस कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सदरहू निधी मिहान प्रकल्पासाठी खालील तक्त्यातील स्तंभ क्र.२ मधील लेखाशीर्षासाठी स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांना वितरीत करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रूपये कोटीमध्ये)**

| अ.क्र. | बाब क्र. | लेखाशीर्ष | सन २०२४-२५ अर्थसंकल्पित तरतूद | या शासन ज्ञापनान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ |
| १. | कलम १८ व २८ अंतर्गत देय रकमांसाठी | ३०५३ ०१७३ | ४२५.०० | १०.७८ |
| २. | प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन आणि १२.५ टक्के सानुग्रह अनुदान | | | ३१.७२ |
| | | | **एकूण** | **४२.५०** |

३.	उपरोक्त खर्च "**मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिताच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४.	बिम्स प्रणालीवर निधी वितरणासाठी सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग {विमानचालन,मंत्रालय,मुंबई (A००३६)} हे नियंत्रक अधिकारी म्हणून नमूद करण्यात आले आहेत. सबब, सदर निधी बिम्स प्रणालीवर सह सचिव /उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन),मंत्रालय,मुंबई यांना वितरीत करण्यात यावा. संचालनालय स्तरावर देयके अदा करण्यासाठी संचालक, विमानचालन,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.	वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकास कामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२५ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांनी घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करण्यात यावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे बाबनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

६.	अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच, खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७.३.२०२५ मधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३६/१४४३, दि. २५/०३/२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २९२/व्यय-४, दिनांक २८ /०३/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२५०३२८१९५४१०६८०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2025.03.28 19:55:02 +05'30'

**(शिल्पा चाचड)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्या-विमान-१)